**मे. महालक्ष्मी गोल्ड इंटरप्रायझेस प्रकरणी, महाराष्ट्र ठेवीदार हित संरक्षण (एम.पी.आय.डी.)अधिनियम १९९९ चे कलम ५ अन्वये सक्षम प्राधिका-यांच्या नेमणूकीबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
### शासन निर्णय क्रमांकः - एमपीआय - २०१४ / प्र.क्र. ९४ / पोल - ११

गृह विभाग, जागतिक व्यापार केंद्र,
कफ परेड, मुंबई.
तारीख: २५ जुलै, २०१४.

**<u>प्रस्तावना</u> -**

आर्थिक गुन्हे शाखा, मुंबई यांच्याकडील मे. महालक्ष्मी गोल्ड इंटरप्रायझेस या कंपनीविरुध्द कॉ. गुन्हा.रजि. नंबर १२२ / २०१३ भादंवि कलम ४२०, १२० (ब) सह महाराष्ट्र ठेवीदार हित संरक्षण अधिनियम १९९९ चे कलम ३ व ४ अन्वये गुन्हा दाखल आहे. या गुन्हयातील मालमत्ता संरक्षीत करण्यासाठी व पुढील चौकशीसाठी महाराष्ट्र ठेवीदारांच्या (वित्तीय संस्थामधील) हितसंबंधांचे संरक्षण अधिनियम १९९९ या कायद्यामधील तरतुदीप्रमाणे कार्यवाही होणे आवश्यक आहे. तसेच सदर कायद्यातील कलम ४ व ५ प्रमाणे कार्यवाही करण्यासाठी उप जिल्हाधिकारी दर्जापेक्षा कमी दर्जा नसलेल्या राज्य शासनाच्या अधिका-याची सक्षम अधिकारी म्हणून नेमणूक होणे आवश्यक आहे.

त्यामुळे सदर गुन्हयामध्ये उपरोक्त नमूद अधिनियमातील कलम ४ व ५ प्रमाणे कार्यवाही करणेकामी उप जिल्हाधिकारी दर्जापेक्षा कमी दर्जा नसलेल्या राज्य शासनाच्या अधिका-याची सक्षम अधिकारी म्हणून नियुक्ती होण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचारधीन होता.

**<u>शासन निर्णय</u> -**

मे. महालक्ष्मी गोल्ड इंटरप्रायझेस या कंपनीविरुध्द दाखल आर्थिक गुन्हे शाखा, गुन्हे अन्वेषण विभाग, गु.र.नं. १२२ / २०१३ या गुन्हयामध्ये महाराष्ट्र ठेवीदारांच्या (वित्तीय संस्थामधील) हितसंबंधांचे संरक्षण अधिनियम, १९९९ चे कलम ५ अन्वये जप्ती आणलेल्या वित्तीय संस्थेच्या मालमत्तेवर नियंत्रण ठेवण्याकरीता तसेच या अधिनियमाची सर्व प्रयोजने पार पाडण्याकरीता जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था क्र. ३, म्हाडा बिल्डींग, रुम नं. ६९, गृहनिर्माण भवन, तळमजला, कलानगर बांद्रा, (पूर्व), मुंबई - ४०० ०५१ यांची सक्षम प्राधिकारी म्हणून नियुक्ती करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०७२५१५०५३८४१२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Punam Hiraman Wagde

Digitally signed by Punam Hiraman Wagde
DN: CN = Punam Hiraman Wagde, C = IN, S = MAHARASHTRA, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = HOME
Date: 2014.07.25 16:00:10 +05'30'

**(पु. हि. वागदे)**
उप सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

प्रत,

(१) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
(२) विभागीय आयुक्त, कोकण विभाग,
(३) जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर जिल्हा,
(४) जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था क्र. ३,
(५) अपर पोलीस आयुक्त, आर्थिक गुन्हे शाखा, गुन्हे अन्वेषण विभाग, मुंबई.
(६) वरिष्ठ पोलीस निरिक्षक, आर्थिक गुन्हे शाखा, कक्ष - ७, मुंबई.
(७) निवडनस्ती, पोल - ११.